# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग

**शासन ज्ञापन क्रमांक दुरुस्ती-०५१८/प्र.क्र.२१२/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक २० जून २०१८.

**विषय** :- पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या अधिपत्याखालील दहिसर पोलीस ठाणे याच्या इमारतीत *"Providing E.I. work and retrofit T8 LED, fans"* हे विद्युतविषयक दुरुस्तीचे काम करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-
१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ १३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोआ/कक्ष-८(११)/ शा.८४/ २०१८, दिनांक २०.०३.२०१८.

**ज्ञापन**.-

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांनी दहिसर पोलीस ठाणे याच्या इमारतीत विद्युत विषयक दुरुस्तीचे पुढील काम करण्यासाठी प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे:-

| कामाचे नाव<br>*(१)* | खर्चाचे अंदाज<br>*(२)* |
|---|---|
| *"Providing E.I. work and retrofit T8 LED."* | रु.२०,०१,०७०/- |

२. उक्त कामासाठी उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम विद्युत उपविभाग, अंधेरी, मुंबई, यांनी सन २०१६-१७ च्या दरसूचीनुसार तयार केलेले रु.२०,०१,०७०/- इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले आहेत. हे खर्चाचे अंदाज कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई (सार्वजनिक बांधकाम) विद्युत विभाग, आणि अधीक्षक अभियंता (विद्युत), पुणे प्रादेशिक विद्युत मंडल, पुणे, यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज हे सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तपासले असून ते **रु.२१,८८,७९७/-** असे सुधारित केले आहेत आणि प्रशासकीय मान्यता देण्यास, विवक्षित अटींवर, सहमती दिली आहे.

४. त्या अनुसार, दहिसर पोलीस ठाणे याच्या इमारतीत *"Providing E.I. work and retrofit T8 LED, fans"* हे विद्युतविषयक दुरुस्तीचे काम करण्यासाठी **रु.२१,८८,७९७/-** इतक्या खर्चाच्या अंदाजास, पुढील अटींवर, याद्वारे, प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१) निधी उपलब्ध झाल्याशिवाय कामास सुरुवात करु नये;
२) खर्चाचे अंदाज हे पोलीस सह आयुक्त (प्रशासन), बृहन्मुंबई, यांनी साक्षांकित करावे.

**५.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग-मागणी क्रमांक बी-१, २०५५, पोलीस, (०२) शहर पोलीस, (०२)(०१) शहर पोलीस-आस्थापना (दत्तमत) (अनिवार्य) (२०५५ ००९७), २७, लहान बांधकामे, याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३१०/इमा-२, दिनांक ०८.०६.२०१८, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०६२०१२०३१३७५२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2018.06.20 12:06:08 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

**प्रत :-**

१) अधीक्षक अभियंता (विद्युत), पुणे प्रादेशिक (सार्वजनिक बांधकाम) विद्युत मंडल, पुणे *(सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी सुधारलेल्या "Abstract" च्या प्रतीसह).*
२) कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई (सार्वजनिक बांधकाम) विद्युत विभाग, मुंबई *(सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी सुधारलेल्या "Abstract" च्या प्रतीसह).*
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
५) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
६) कार्यासन अधिकारी (इमा-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (व्यय-७), मंत्रालय, मुंबई.
८) निवड फाईल (पोल-७).